


## अनाथ मुलांचा पिता

यानुस कोर्झाक हे एक लेखक, रेडिओ कलाकार, शिक्षक आणि मुलांचे डॉक्टर होते. पोलंड देशातील वॉर्सा शहरात ते ज्यू मुलांच्या एका अनाथालयाचे प्रमुख होते. जर्मनीत हिटलर आणि नाझी पक्षाचा उदय होत असताना कोर्झाक शेकडो अनाथ मुलांना मायेने सांभाळत होते. मुलं त्यांना आपले पिता मानत आणि प्रेमाने त्यांना “वृद्ध डॉक्टर” म्हणत.

कोर्झाक आपल्या अनाथालयातील मुलांना वाचवू शकले नाहीत. पण महायुद्धाच्या अंधःकारात त्यांनी मुलांना सुरक्षित ठेवण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. शेवटी हिटलरचे सैनिक अनाथ मुलांना ट्रेब्लिंका गॅस चेंबरमध्ये घेऊन गेले. कोर्झाक अखेरपर्यंत मुलांसोबत राहिले. यानुस कोर्झाक यांचे हिटलरच्या मृत्यूछावणीतील जीवन म्हणजे एक मन हेलावून टाकणारी शोकांतिका आहे. मनुष्याच्या अतुलनीय धैर्याचीही ही कहाणी आहे.

# यानुस कोर्झाक

## अनाथ मुलांचा पिता







1878 या वर्षी युरोपमध्ये एक नवे पर्व सुरू झाले. रोममध्ये नवा पोप निवडण्यात आला. एका नव्या राजाला सिंहासनावर बसवण्यात आले.

त्या वर्षी पॅरिसमध्ये एक मोठे आंतरराष्ट्रीय प्रदर्शन भरवण्यात आले. प्रदर्शनात हजारो कलाकृती होत्या. त्यात स्वातंत्र्याचे प्रतिक असलेले एक शिल्प होते. प्रदर्शन संपल्यावर हे "स्टॅच्यू ऑफ लिबर्टी" शिल्प अमेरिकेस पाठवण्यात आले. फ्रेंच लोकांनी हे शिल्प अमेरिकेस भेट म्हणून दिले होते.

1878 मध्ये आगामी संकटाची चाहूल लागली. जर्मनीतील गोथा या शहरात युरोपमधील पहिले दहनगृह सुरू झाले. यामध्ये मृत लोकांच्या शरीरावर अंतिम संस्कार होत असत.



यानुस कोर्झाक यांचा जन्म 1878 साली पोलंड देशातील वॉर्सा शहरात झाला. अवघा युरोप अत्यंत वाईट काळातून जात असताना त्यांनी नायकाची भूमिका बजावली. पोलंडने 'सर्वश्रेष्ठ नागरिक' म्हणून त्यांचा सन्मान केला.

कोर्झाक यांच्या बालपणी वॉर्सा हे एक खूप सुंदर शहर होते. ते व्हिस्चुला नदीकाठी वसलेले होते. शहरात दगडी रस्ते, चेस्टनटची झाडे, सार्वजनिक बागा, हवेल्या, वाडे होते.

कोर्झाकचे आईवडील होते जोसेफ आणि सेसिलिया गोल्डस्मिथ. त्याचे पिता एक यशस्वी वकील होते आणि आई एका प्रतिष्ठित व्यापाऱ्याची मुलगी होती. ते धर्माने ज्यू होते परंतु धार्मिक नव्हते. त्यांनी आपल्या मुलाचे नाव आजोबांच्या नावावरून ठेवले. परंतु ज्यू भाषेतील हिर्ष अशा उच्चाराऐवजी सर्व त्याला हेन्रिक म्हणू लागले. यानुस कोर्झाक हे नाव त्याने फार नंतर घेतले.



बालपणी हेन्रिक गोल्डस्मिथ स्वभावाने अतिशय शांत होता. तो लाकडी ठोकळ्यांशी तासनतास खेळत बसे आणि कायम स्वप्नांमध्ये हरवलेला असे. आपल्या स्वप्नांमधून स्वत:लाच पऱ्यांच्या कहाण्या ऐकवण्याची गंमत तो अनुभवत असे. पुस्तकांचा खजिना सापडल्यावर मात्र तो दिवसभर पुस्तकांचाच फडशा पाडू लागला.

हेन्रिकचे काही निवडक मित्र होते. ते नेहमी जवळच्या सास्की बागेत फिरायला जात. हेन्रिक लिहितो, “तिथे मी समवयस्क तसेच वयस्कर लोकांशी गप्पा मारत बसे. माझे काही मित्र तर वयोवृद्ध होते. ते मला तत्वज्ञानी म्हणत आणि माझे कौतुक करत.”

मग एकाएकी1889 साली हेन्रिकच्या शांत आयुष्यात एक दुर्घटना घडली. त्याच्या वडिलांना मानसिक विकार जडला आणि 1896 साली त्यांचा मृत्यू झाला. ते त्यावेळी फक्त 52 वर्षांचे होते. हेन्रिकला वडिलांच्या मृत्यूचे अनावर दु:ख झाले. कधीतरी आपणसुद्धा वडिलांसारखे वेडे होऊ, अशी भीतीही त्याला वाटू लागली.

जोसेफ गोल्डस्मिथ यांच्या मृत्यूनंतर कुटुंबाची आर्थिक स्थिती बिघडली. त्यांनी घरचे किंमती फर्निचर, सुंदर पेंटींग आणि भांडीकुंडी विकून टाकली. हेन्रिक शाळा सुटल्यावर काम करू लागला, मुलांच्या शिकवण्या घेऊ लागला. त्याच्या आईने खर्च भागवण्यासाठी घरात खाणावळ सुरू केली.

या काळात हेन्रिकने नैराश्य आणि दुःखाने प्रेरित असलेल्या कथा-कविता लिहिण्यास सुरुवात केली.

एके ठिकाणी तो लिहितो, “मला मरू द्या, अंधाऱ्या थडग्यात झुरू द्या.”

त्याने एक नाटकही लिहिले. हे नाटक एक वेड लागलेला मनुष्य आणि त्याचे कुटुंब या विषयावर आधारित होते. या नाटकाला त्याने एका स्पर्धेसाठी पाठवले. स्पर्धेसाठी त्याने यानुस कोर्झाक हे टोपणनाव घेतले. यामुळे तो ज्यू धर्माचा आहे, हे स्पर्धेच्या परिक्षकांना कळणार नव्हते.





कोर्झाकने वॉर्सा विद्यापीठात वैद्यकशास्त्राचे शिक्षण घेतले. डॉक्टर बनल्यावर काही काळ त्यांनी एका मुलांच्या हॉस्पीटलमध्ये काम केले. ते म्हणत असत, “मला मुलांमध्ये रमायला खूप आवडतं.”

कोर्झाकने मुलांसाठी गोष्टी लिहिल्या आणि मोठ्यांसाठीही पुस्तके लिहिली. “मुलांचा, त्यांच्या विचारांचा आदर करा आणि सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे मुलांना भरपूर प्रेम द्या,” असे उपदेश ते मोठ्यांना करत.

यानुस कोर्झाक ज्यू मुलांसाठी सुरू झालेल्या नव्या अनाथालयाचे प्रमुख बनले. ते मुलांना साखरेच्या गोळ्या वाटत, त्यांना कथा-विनोद ऐकवत, जादू दाखवत. ते मुलांना रंगीत खडू देत आणि आपल्या टकलावर चित्र काढण्यास सांगत. मुलांना गृहपाठ करण्यास ते मदत करत आणि मुलांसोबत खेळ खेळत.

यानुस कोर्झाक त्यांच्या मुलांमध्ये फार प्रिय होते.

कोर्झाक बाहेर बसले की छोटी मुले त्यांच्या अंगाखांद्यावर चढत, त्यांच्या दाढीशी खेळत. बऱ्याचदा मुले त्यांच्या कुशीत झोपत. कोर्झाक मंद स्मित करत म्हणत, “मी एका वठलेल्या झाडासारखा आहे आणि ही मुले माझ्या फांद्यांवर बसणाऱ्या पक्ष्यांसारखी आहेत.”

कोर्झाक अनाथालयातील मुलांचे डॉक्टर, हजाम, शिक्षक, पिता असे सर्व काही होते. ते मुलांची नखे आणि केस कापत, मुलांच्या चपलांची दुरुस्ती करत. कुणा छोट्या मुलाचा दुधाचा दात पडला की ते त्याला बक्षीस देत. असे अनेक दात साठवून त्यांनी त्यापासून मुलांना खेळण्यासाठी एक छोटा किल्ला बनवला.

रात्री झोपण्याच्या वेळी कोर्झाक आणि त्यांची मदतनीस स्टेफेनीया विल्झिस्का प्रत्येक मुलाच्या पलंगाजवळ जाऊन त्याच्याशी बोलत, त्याच्या अंगावर पांघरूण घालत आणि त्यांना गुडनाईट म्हणत.





1930 साली रेडिओ हे साधन नवीन होते. साहजिकच, लोकांना रेडिओ ऐकायला मजा येत असे. कोर्झाक रेडिओवर नियमितपणे दर आठवड्याला कथा आणि उपदेशपर कार्यक्रम सादर करत असत.

पोलंडमध्ये कोर्झाक यांचे कार्यक्रम अतिशय लोकप्रिय झाले. यासाठी पोलीश साहित्य अकादमीने "गोल्डन लॉरेल" पुरस्कार देऊन त्यांचा सन्मान केला. पोलीश प्रजासत्ताकाने राष्ट्र निर्माण कार्यासाठी त्यांना "सिल्व्हर क्रॉस" पुरस्कार प्रदान केला.

1930 साली संपूर्ण युरोप एका गंभीर परिस्थितीतून जात होता. 1933 साली वॉर्सापासून 350 मैलांवर असलेल्या बर्लिनमध्ये ज्यू धर्मीयांच्या विरोधी असलेल्या नाझी पक्षाचे सरकार सत्तेवर आले. त्यांनी ज्यू धर्मियांची पुस्तके जाळली आणि त्यांच्या मालमत्तेवर ताबा मिळवला.

1938 साली जर्मन फौज ऑस्ट्रिया देशात शिरली. 1 सप्टेंबर 1939 रोजी जर्मन फौजांनी पोलंडमधील वॉर्सा आणि इतर काही शहरांवर कब्जा केला. या काळात तिथे दिवसरात्र गोळीबार आणि बॉंबहल्ले सुरू असत. सप्टेंबर महिन्याच्या अखेरीस पोलंडने हार स्वीकारली.

जर्मन फौजांनी पोलंडवर ताबा मिळवल्यावर नाझी लोक तिथे घुसले. त्यांनी तेथील ज्यू लोकांवर जुलूम केले, त्यांची मालमत्ता व व्यवसाय जप्त केले, आणि त्यांना सक्तीने मजुरांच्या छावण्यांमध्ये पाठवले. त्यांनी बळाचा वापर करून प्रत्येक ज्यू व्यक्तिला दंडावर डेव्हिडच्या ताऱ्याचे चिन्ह असलेला पट्टा बांधायला लावला.

यानुस कोर्झाक यांनी मात्र असा पट्टा दंडावर न बांधण्याची शपथ घेतली.





1940 साली नाझींच्या आदेशाचे पालन न केल्याबद्दल यानुस कोर्झाक यांना अटक करण्यात आली. एका महिन्यानंतर त्यांची सुटका झाली. पण वर्षभरानंतर पुन्हा त्यांना अटक केली गेली. यावेळी एका मित्राने त्यांना सोडवून आणले.

एप्रिल 1940 मध्ये वॉर्सात एक आठ फूट उंच भिंत बांधण्यात आली. या भिंतीवर टोकदार तारा बसवण्यात आल्या. भिंतीच्या अंतर्गत भागात 73 रस्ते होते. या भागात चार लाखापेक्षा जास्त ज्यू लोकांना राहाण्याची सक्ती केली गेली. कोर्झाक आणि त्याच्या अनाथालयातील मुलेसुद्धा तिथेच राहात होती. या भागाला “वॉर्सा घेट्टो” (ज्यू लोकांची वस्ती असलेला भाग) असे नाव पडले.



कोर्झाक आपल्या मुलांना “वॉर्सा घेट्टो”मध्ये घेऊन जाण्यास नाखूष होते. लहान मुले तिथे घाबरतील असे त्यांना वाटत होते. मग त्यांनी मुलांना एका रांगेत उभे केले. सगळ्यात पुढे कोर्झाक होते आणि त्यांच्या सोबत एक मुलगा होता. या मुलाच्या हाती “किंग मॅट”चा झेंडा होता. “किंग मॅट” हे कोर्झाक यांच्या पुस्तकातील बाल राजाचे पात्र होते आणि तो मुलांचा हिरो होता. मुलांनी कवायत करत, गाणे गात घेट्टोमधील नव्या घरात प्रवेश केला.

1941 साली नाझींनी घेट्टोचे क्षेत्र घटवले. त्यामुळे मुलांना पुन्हा घर बदलावे लागले.

जानेवारी 1940 मध्ये कोर्झाकने दैनंदिनी लिहायला घेतली. पण त्यात ते क्वचितच लिहित असत. मे 1942 नंतर त्यांनी नियमितपणे दैनंदिनी लिहायला सुरुवात केली. त्यात त्यांनी घेट्टोचे वर्णन करताना म्हटले, “प्लेगने ग्रासलेला भाग........मनोरुग्णालय”. त्यांनी घेट्टोला “तुरुंग” म्हटले.



घेट्टोतील घरात अनेक कुटुंबे दाटीवाटीने राहात. तिथे अन्न, कोळसा, जळण, औषधे पुरेशी नव्हती. हजारो लोक रस्त्यावर भीक मागत. लोक आपल्याकडील वस्तुंच्या बदल्यात पावाचा एक तुकडा मागत. घेट्टोमध्ये दर महिन्याला भूक आणि आजारपणामुळे हजारो लोकांचा मृत्यू होई.

कोर्झाक लिहितो, “माझी मुले एका अनिश्चित आणि भीतीदायक वातावरणात जगत आहेत.”

12 जुलै 1942 रोजी, ‘लवकरच घेट्टो रिकामे करण्यात येणार, ज्यू लोकांना काम करण्यासाठी पूर्व भागात नेणार,’ असे जाहीर झाले. पण लोकांना हे खरे नाही, हे उमगले होते. ज्यू लोकांना मृत्युच्या छावणीत नेणार, हेच सत्य होते. तिथे उरलेले अवशेष दहनघरात नष्ट करण्याची योजना होती. 4 ऑगस्ट रोजी कोर्झाक यांनी दैनंदिनीत लिहिले, “सकाळी-सकाळी 5.30 वाजता ढग दाटून आलेयत. आजचा दिवस हा नेहमीसारखाच जाणार वाटतं.” त्यांनी आपल्या मुलांच्या चेहऱ्यावरील हास्याबद्दल लिहिले, “त्यांचं हास्य निस्तेज वाटतं. ते आजारी आहेत. त्यांची फुफ्फुसे कमजोर झालीयत.”

दोन दिवसांनंतर 6 ऑगस्ट रोजी नाझी लोक कोर्झाकच्या मुलांना अटक करण्यासाठी आले.

कोर्झाकला तयारीसाठी फक्त 15 मिनिटांचा अवधी देण्यात आला. कोर्झाकने मुलांना म्हटले, “चिंता करण्याचे आणि घाबरण्याचे कारण नाही. काहीही झाले तरी मी सतत तुमच्यासोबत असेन.” कोर्झाकने प्रत्येक मुलाला त्याची प्रिय वस्तू, एखादे खेळणे किंवा पुस्तक, सोबत घेण्यास सांगितले. मग मुले बाहेर रांग बनवून उभे राहिले. ते आपल्या प्रिय “वृद्ध डॉक्टर”च्या मागेमागे कवायत करत चालू लागले. सगळ्यात पुढे असणाऱ्या मुलाच्या हाती “किंग मॅट”चा झेंडा होता.

कोर्झाक, त्यांची मदतनीस आणि 192 मुले थेट समोर बघत चालत राहिले. चालताचालता ते कवायतगीत म्हणू लागले. अशा प्रकारे स्टेशनपर्यंत त्यांनी दोन मैलांचा प्रवास केला. वाटेत ते एका ज्यू धर्मीयांच्या कबरस्तानाजवळून गेले. तिथे दफन न केलेल्या प्रेतांचा ढीग होता. मुले कोर्झाकच्या मागेमागे चालत राहिले.





ऐतिहासिक कागदपत्रांत एक नोंद आढळते, 'शेवटच्या क्षणी एका नाझी सैन्याधिकाऱ्याने यानुस कोर्झाकला ओळखले आणि त्यांना सोडून देण्याचे आदेश दिले. पण यानुस कोर्झाकने परत जाण्यास नकार दिला. अंतिम क्षणी ते आपल्या मुलांना एकटेच सोडून जाण्यास तयार नव्हते.'

स्टेशनवर लोक आपल्याला ट्रेनमध्ये बळजबरीने चढवू नये, यासाठी रडत-भेकत होते, आकांत करत होते. याउलट, यानुस कोर्झाकने मात्र आपल्या मुलांना ट्रेनमध्ये चढण्यास मदत केली.



ट्रेन त्यांना ईशान्य दिशेत 60 मैलांवर असलेल्या ट्रेब्लिंका स्टेशनवर घेऊन गेली. या स्टेशनवर रेस्टॉरंट, हॉटेल, सलून आणि बेकरी अशा खोट्या पाट्या होत्या. इतर शहरांत जाणाऱ्या ट्रेनच्याही पाट्या दिसत होत्या. पण ज्यू लोकांसाठी ट्रेब्लिंक स्टेशन हेच अंतिम मुक्कामाचे ठिकाण होते. तिथून ते अन्यत्र कुठेही जाणार नव्हते.

तिथेच यानुस कोर्झाकचा त्यांच्या अनाथ मुलांसह मृत्यू झाला.

मृत्यूअगोदर यानुस कोर्झाकने आपल्या दैनंदिनीत शेवटची नोंद केली, “मी कधी कुणाबद्दल वाईट चिंतलं नाही, कुणाचं वाईट केलं नाही. कुणाचं वाईट कसं करायचं हेदेखील मला माहित नाही.”

## लेखकाचे मनोगत

1878 हेच यानुस कोर्झाकचे जन्मसाल आहे, हे निश्चितपणे सांगता येत नाही. 1942 साली यानुस कोर्झाकने आपल्या दैनंदिनीत लिहिले, “मी उद्या 63 किंवा 64 वर्षांचा होईन. गेल्या कित्येक वर्षांत वडिलांनी माझा जन्मदाखलाच बनवला नाही. त्यामुळे मला बऱ्याच अडचणी आल्या.”

कोर्झाक लहान असताना नेहमी एकटाच शांतपणे खेळत असे. त्याची आई म्हणते की त्याच्यात काही महत्त्वाकांक्षाच नव्हती. कोर्झाकचे वडील त्याला मूर्ख समजत. पण त्याची आजी त्याला “छोटा तत्वज्ञानी” म्हणत असे.

कोर्झाकने सोव्हियत रशिया-जपान, पहिले महायुद्ध आणि पोलंड-सोव्हियत रशिया अशा तीन युद्धांदरम्यान एक डॉक्टर म्हणून सैन्यात काम केले.

कोर्झाकने रेडिओ कार्यक्रम करताना प्रथमच “वृद्ध डॉक्टर” हे टोपणनाव वापरले. कारण श्रोते एका ज्यू मनुष्याकडून उपदेश ऐकत आहेत, हे रेडिओ स्टेशनच्या अधिकाऱ्यांना लपवायचे होते.

